श्री. पी. डी. गोलेकर (से.नि.) सह आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क (गट-अ) यांना सह आयुक्त (गट-अ), राउशु या पदावरील मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

**शासन आदेश क्रमांक: न्यायाप्र-४०१७/ प्र.क्र.६/राउशु-१,**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- १९ जुलै, २०१८.

वाचा:-

१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआव्ही-२००२/प्र.क्र.२/२००२/१२, दि.०६.०६.२००२.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/ व्हीआयपी२१०/ प्र.क्र.४१२/का-१२, दि.२१.०८.२०१५.

३) मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.१६५७/१९९८ मध्ये मा.न्यायालयाने दि.२५.०७.२०१७ रोजी पारित केलेले आदेश.

**शासन आदेश -**

शासकीय सेवेतील वर्ग एकच्या संवर्गातील पहिल्या पदोन्नती नंतरच्या प्रत्येक टप्प्यावरील पदोन्नत्या ह्या केवळ गुणवत्तेच्या आधारे असल्याने तसेच श्री. पी. डी. गोलेकर यांचे गोपनीय अहवाल त्यांच्या पेक्षा सेवेने वरिष्ठ असलेल्या अधिकाऱ्यांपेक्षा उच्च दर्जाचे असल्याने त्यांना सह आयुक्त (गट-अ) या पदी पदोन्नती देणेबाबत श्री. गोलेकर मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे रिट याचिका क्र.१६५७/१९९८ दाखल केली होती. सदर याचिकेवर मा. न्यायालयाने दि.२५.०७.२०१७ रोजी अंतिम आदेश पारित केले असून शासनाचे दि.०८.०२.१९९१ च्या आदेशान्वये सह आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क पदावर देण्यात आलेले पदोन्नतीचे आदेश रद्दबातल करून श्री.गोलेकर यांना सह आयुक्त, राउशु या पदाचा दि.०१.०२.१९९१ हा मानीव दिनांक देण्याबाबत व दि.०८.०२.१९९१ ते दि.३१.०१.२००७ या कालावधी मधील वेतनाच्या फरकाची रक्कम आणि तद्अनुषंगाने इतर वित्तीय लाभ (म.ना.से. निवृत्ती वेतन नियम १९८२ अंतर्गत निवृत्ती वेनाची रक्कम व्याजासह तपासून) देण्याबाबत आदेशित केले आहे व ही कार्यवाही तीन महिन्याच्या आत पूर्ण करण्याबाबत आदेशित केले आहे.

२. रिट याचिका क्र.१६५७/१९९८ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२५.०७.२०१७ रोजी दिलेल्या अंतिम निकालाच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर येथे सिव्हिल ॲप्लीकेशन व रिव्ह्यू पिटीशन दाखल करण्यात आल्या आहेत. सदर याचिकांवर सुनावणीवेळी मा.न्यायालयाने प्रथम दि.२५.०७.२०१७ रोजी दिलेल्या आदेशाची अंमलबजावणी करण्याचे आदेश दि.१५.६.२०१८ व दि.५.७.२०१८ रोजी दिले आहेत.

३. मा.न्यायालयाच्या आदेशास अनुसरून श्री.पी.डी.गोलेकर (सेवानिवृत्त), सह आयुक्त, राउशु यांना सह आयुक्त, राउशु या पदावरील पदोन्नतीचा दि.०१.०२.१९९१ हा मानीव दिनांक म्हणून प्रदान करण्यात येत आहे. तसेच सदर पदावरील मानीव दिनांक हा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून व मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या रिव्ह्यू पिटीशनच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. या प्रकरणी आयुक्त, राउशु यांना कळविण्यात येते की, सदर मानीव दिनांक ते श्री. गोलेकर नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्याचा दि.३१.०१.२००७ या कालावधीतील त्यांची काल्पनिक वेतननिश्चिती करावी व दि.०८.०२.१९९१ ते दि.३१.०१.२००७ या कालावधीतील वेतन व भत्त्यांची थकबाकी त्यांना अदा करण्यात यावी. काल्पनिक वेतन निश्चितीचा लाभ श्री.गोलेकर यांना त्यांचे निवृत्तीवेतन, उपदान, अंशराशीकरण व रजा रोखीकरण या प्रयोजनांसाठी अनुज्ञेय राहील.

५. सदरहू शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.२१.०८.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.विवि/शिकाना/३७४, दि.१९.७.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०७१९१७०७५८९०२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.07.20 11:50:25 +05'30'

**( पु. हि. वागदे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई.
३) उप सचिव (सेवा-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७) श्री. पी. डी.गोलेकर (सेवानिवृत्त), सह आयुक्त, राउशु (मार्फत आयुक्त, राउशु)
८) निवडनस्ती (राउशु-१)